**अल्पसंख्याक बहूल जिल्हयात बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रम राबविण्याकरिता अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्यांक विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक बियुडी-२०११/प्र.क्र.४७/का.७
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च, २०११.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाने लोकसंख्या, सामाजिक व आर्थिक स्थिती आणि मुलभूत सुविधांची उपलब्धता या मानकांच्या आधारे महाराष्ट्रातील परभणी, बुलढाणा, वाशिम व हिंगोली हे ४ जिल्हे अल्पसंख्याक बहूल जिल्हे म्हणून घोषित केले असून या जिल्हयांच्या सर्वांगीण विकासासाठी बहूक्षेत्रीय विकास कार्यक्रम सन २००९-१० या वर्षापासून राबविण्यात येत आहे.

२. उपरोक्त जिल्हयांपैकी बुलढाणा, परभणी, वाशिम जिल्हयाकरीता घरकूल योजनेसाठी व अंगणवाडी योजनेसाठी तसेच हिंगोली जिल्हयाकरीता घरकूल योजनेसाठी दुसरा हप्ता केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाने त्यांच्या दि. १७/३/२०११, दि.२१/३/२०११, दि.२३/३/२०११ व दि.२४/३/२०११ च्या पत्रान्वये मंजूर केला असून दि. १८/३/२०११, दि.२३/३/२०११ व दि.२४/३/२०११ रोजीच्या पत्रान्वये सदर मंजुर करण्यात आलेली रक्कम रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, नागपुर शाखेत जमा झाली असल्याचे कळविले आहे. यापैकी अंगणवाडी केंद्र योजनेसाठी केंद्रातर्फे १००% अर्थसहाय्य देण्यात येणार आहे तर घरकूल योजनेसाठी केंद्राकडून ७५% अर्थसहाय्य देण्यात येणार आहे व उर्वरित २५% अर्थसहाय्यची तरतूद राज्य सरकारने करणे अपेक्षित आहे.

३. उपरोक्त जिल्हयांकरिता पहिल्या टप्प्यातील निधी शासन निर्णय दि. ३०/३/२००९ व दि. ३/९/२०१० अन्वये वितरीत करण्यात आला होता. दुसऱ्या टप्प्यातील केंद्र शासनाने चार जिल्हयांसाठी मंजूर केलेल्या योजनांचे व त्या अंतर्गत केंद्राच्या मंजूर प्रती युनिट खर्चानुसार प्राप्त होणाऱ्या निधीचे विस्तृत विवरण खालीलप्रमाणे आहे.

**रु.लाखत**

| अ. क्र. | जिल्हा | योजना | युनिटची संख्या | युनिट कॉस्ट | केंद्राचा हिस्सा | राज्याचा हिस्सा | केद्रातर्फे दुसऱ्या टप्प्यात मंजूर करण्यात आलेली ५०% तरतूद |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | बुलढाणा | घरकुल योजना (IAY) | ३,००० | ०.३५ | ७८७.५ | २६२.५ | ३९३.७५ |
| | | अंगणवाडी | २३७ | ३ | ७११ | -- | ३५५.५० |
| | | **एकूण** | | | | | **७४९.२५** |
| २ | हिंगोली | घरकुल योजना (IAY) | २,८५७ | ०.३५ | ७४९.९६ | २४९.९८ | ३७४.९८ |
| | | **एकूण** | | | | | **३७४.९८** |
| ३ | परभणी | घरकुल योजना (IAY) | २,२०० | ०.३५ | ५७७.५ | १९२.५ | २८८.७५ |
| | | अंगणवाडी | २०० | ३ | ६०० | --- | ३००.०० |
| | | **एकूण** | | | | **९६.२५** | **५८८.७५** |
| ४ | वाशिम | घरकुल योजना (IAY) | २,००० | ०.३५ | ५२५ | १७५ | २६२.५० |
| | | अंगणवाडी | १३२ | ३ | | -- | १९८.०० |
| | | **एकूण** | | | | | **४६०.५०** |
| | | **एकूण १+२** | | | | | **२१७३.४८** |

४. इंदिरा आवास योजनेंतर्गत केंद्र शासनानं एका घरकूलाची किंमत रु. ३५०००/- इतकी निश्चित करण्यात आली आहे, परंतू राज्याच्या ग्राम विकास विभाग व जलसंधारण विभागाने दि.१ एप्रिल २००९ पासून बांधण्यात येणाऱ्या नवीन घरकूलांसाठी रु. ७०००० प्रती घरकूल इतकी किंमत निश्चित केली आहे त्यामुळे सदर योजनेंतर्गत केंद्राचा, राज्याचा व लाभार्थ्याचा हिस्सा सध्या पुढीलप्रमाणे आहे.

| | |
|---|---|
| भारत सरकार अनुदान(रु. ३५,०००/- मध्ये ७५%)प्रमाणे | रु. २६२५०/- |
| महाराष्ट्र शासन (रु. ३५,०००/- मध्ये २५% प्रमाणे) | रु. ८७५०/- |
| महाराष्ट्र शासन अतिरिक्त अनुदान | रु. ३३५००/- |
| लाभार्थी हिस्सा | रु. १५००/- |
| एकूण | रु. ७००००/- |

अशा प्रकारे इंदिरा आवास योजनेंतर्गत सध्या राज्य शासनातर्फे प्रती घरकूल रु. ४२२५०/- इतके अनुदान उपलब्ध करुन दिले जात आहे.

५. यामुळे राज्य शासनाच्या मंजूर प्रती युनिट खर्चाप्रमाणे सदर योजनेसाठी लागणाऱ्या निधीचे विस्तृत विवरण खालीलप्रमाणे राहील. या जिल्हयांसाठी मंजूर केलेल्या योजनांचे व त्या अंतर्गत प्राप्त होणाऱ्या निधीचे विस्तृत विवरण खालीलप्रमाणे आहे.

**रु.लाखात**

| अ. क्र. | जिल्हा | योजना | युनिटची संख्या | केद्रातर्फे मंजूर करण्यात आलेली दुसऱ्या टप्प्यातील ५०% तरतूद | राज्याने करावयाची तरतूद | | | एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | (रु. ३५००० प्रती घरकूल प्रमाणे २५% च्या ५०% ) | (रु. ७०००० प्रती घरकूल प्रमाणे @ रु. ३३५००/- अतिरिक्त अनुदानाच्या ५०%) | **एकूण राज्याचा हिस्सा** | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | बुलढाणा | घरकुल योजना (IAY) | ३,००० | ३९३.७५ | १३१.२५ | ५०२.५० | ६३३.७५ | १०२७.५० |
| | | अंगणवाडी | २३७ | ३५५.५० | -- | -- | -- | ३५५.५० |
| | | **एकूण** | | **७४९.२५** | **१३१.२५** | **५०२.५०** | **६३३.७५** | **१३८३.००** |
| २ | हिंगोली | घरकुल योजना (IAY) | २,८५७ | ३७४.९८ | १२४.९९ | ४७८.५५ | ६०३.५४ | ९७८.५२ |
| | | **एकूण** | | **३७४.९८** | **१२४.९९** | **४७८.५५** | **६०३.५४** | **९७८.५२** |
| ३ | परभणी | घरकुल योजना (IAY) | २,२०० | २८८.७५ | ९६.२५ | ३६८.५० | ४६४.७५ | ७५३.५० |
| | | अंगणवाडी | २०० | ३००.०० | -- | -- | -- | ३००.०० |
| | | **एकूण** | | **५८८.७५** | **९६.२५** | **३६८.५०** | **४६४.७५** | **१०५३.५०** |
| ४ | वाशिम | घरकुल योजना (IAY) | २,००० | २६२.५० | ८७.५० | ३३५.०० | ४२२.५० | ६८५.०० |
| | | अंगणवाडी | १३२ | १९८.०० | -- | -- | -- | १९८.०० |
| | | **एकूण** | | **४६०.५०** | **८७.५०** | **३३५.००** | **४२२.५०** | **८८३.००** |
| | | एकूण १+२+३+४ | | **२१७३.४८** | **४३९.९९** | **१६८४.५५** | **२१२४.५४** | **४२९८.०२** |

i) उपरोक्त तक्त्यामधील स्तंभ क्र.५ प्रमाणे बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रम राबविण्याकरिता सन २०१०-११ या वर्षासाठी घरकुल व अंगाणवाडी योजनेकरिता **केंद्राचा हिस्सा** म्हणून **बुलढाणा** जिल्हयासाठी रु. ७४९२५०००/- (रु. सात कोटी एकोणपन्नास लक्ष पंचविस हजार फक्त) एवढी रक्कम तसेच घरकुल योजनेकरिता **राज्याचा हिस्सा** म्हणून **बुलढाणा** जिल्हयासाठी रु.६३३.७५ लाख **पैकी रु. २३२८५०००/--** (रु. दोन कोटी बत्तीस लक्ष पंचाऐंशी हजार फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम **बुलढाणा**

जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

ii) तक्त्यामधील स्तंभ क्र.५ प्रमाणे बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रम राबविण्याकरिता सन २०१०-११ या वर्षासाठी घरकुल योजनेकरिता **केंद्राचा हिस्सा** म्हणून **हिंगोली** जिल्हयासाठी रु. ३७४९८०००/- (रु. तीन कोटी चौऱ्हयात्तर लक्ष अठठयान्नव हजार फक्त) एवढी रक्कम व **राज्याचा हिश्श्यासाठी रु. ६०३५४०००/-** (रु. सहा कोटी तीन लक्ष चौपन्न हजार फक्त)इतकी रक्कम वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम **हिंगोली** जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

iii) तक्त्यामधील स्तंभ क्र.५ प्रमाणे बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रम राबविण्याकरिता सन २०१०-११ या वर्षासाठी घरकुल व अंगाणवाडी योजनेकरिता **केंद्राचा हिस्सा** म्हणून **परभणी** जिल्हयासाठी **रु. ५८८७५०००/-** (रु. पाच कोटी अठ्ठयाऐंशी लक्ष पंचाहत्तर हजार फक्त) एवढी रक्कम तसेच घरकुल योजनेकरिता **राज्याचा हिस्सा** म्हणून **परभणी** जिल्हयासाठी **रु. ४६४७५०००/-** (रु. चार कोटी चौसष्ठ लक्ष पंचाहत्तर हजार फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम **परभणी** जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

iv) तक्त्यामधील स्तंभ क्र.५ प्रमाणे बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रम राबविण्याकरिता सन २०१०-११ या वर्षासाठी घरकुल व अंगाणवाडी योजनेकरिता **केंद्राचा हिस्सा** म्हणून **वाशिम** जिल्हयासाठी **रु. ५८८७५०००/-** (रु. पाच कोटी अठ्ठयाऐंशी लक्ष पंचाहत्तर हजार फक्त) एवढी रक्कम तसेच घरकुल योजनेकरिता **राज्याचा हिस्सा** म्हणून **वाशिम** जिल्हयासाठी **रु. ४६४७५०००/-** (रु. चार कोटी चौसष्ठ लक्ष पंचाहत्तर हजार फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम **वाशिम** जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

वरीलप्रमाणे बुलढाणा, हिंगोली , परभणी व वाशिम जिल्हयांकरिता केंद्र शासनाच्या हिश्श्याकरिता एकुण रु.२१७३.४८ लाख इतका निधी तसेच राज्य शासनाच्या हिश्श्याकरिता एकूण रु. १७२३.६४ लाख इतका निधी वितरित करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

६. जिल्हाधिकारी, बुलढाणा/हिंगोली/परभणी/वाशिम यांना सन २०१०-११ करिता उपरोक्तप्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

७. संबंधित जिल्हाधिकारी यांनी **केंद्राचा हिश्श्यामधील** व **राज्याचा हिश्श्यामधील** इंदिरा आवास योजनेंतर्गत घरकुल व अंगणवाडी योजनेची रक्कम संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेकडे सुपूर्द करावी .

८. उपरोक्त निधीचा विनियोग करताना बुलढाणा, हिंगोली जिल्हयांकरिता संबंधित योजनेबाबत केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाने सदर योजनेच्या अनुदान वितरणाबाबत दि.१७/३/२०११ च्या पत्रान्वये तसेच परभणी जिल्हयाकरिता सदर योजनेच्या अनुदान वितरणाबाबत दि.२१/३/२०११ व दि.२४/३/२०११ च्या पत्रान्वये व वाशिम जिल्हयाकरिता सदर योजनेच्या अनुदान वितरणाबाबत दि.२३/३/२०११ च्या पत्रान्वये विहित केलेल्या अटी व शर्तीचे तंतोतंत पालन करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांची राहील.

९. सदर योजनेंतर्गत **केंद्राचा हिश्श्यावर** होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१ , मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना **०० (१७)** अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना केंद्राचा हिस्सा (२२३५- ए ५४३) ३१ सहायक अनुदान" या खाली सन २०१०-११ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

१०. सदर योजनेंतर्गत **राज्याचा हिश्श्यावर** होणारा खर्च मागणी क्र.झेड ई-१ , मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना **(०१)(१४)** अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना (२२३५-ए-२३-१) ३१ सहायक अनुदान या खाली सन २०१०-११ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

११. हा शासन निर्णय, नियोजन सहमतीने व व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३०९/११/व्यय-४ दि.३१.३.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.mdd.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०११०३३११९०२३६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(व्यंकटेश भट )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
जिल्हाधिकारी, जि. हिंगोली/जि.बुलढाणा/जि. वाशिम/जि. परभणी
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जि. हिंगोली/जि.बुलढाणा/जि. वाशिम/जि. परभणी
कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, जि. हिंगोली/जि.बुलढाणा/जि. वाशिम/जि. परभणी
प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा, जिल्हा परिषद, जि. हिंगोली/जि.बुलढाणा/जि. वाशिम/जि. परभणी
जिल्हा कोषागार अधिकारी, जि. हिंगोली/जि.बुलढाणा/जि. वाशिम/जि. परभणी
निवडनस्ती.